# ती

**‘हनुबाब’ उर्फ श्री. हनुमंत ह. रेडकर**

(havhanubab@gmail.com)

**प्रकाशक:**

eBook Publication Pvt. Ltd.

4/47, उदय को. हौ. सोसायटी,

आरे रोड, गोरेगाव पश्चिम,

मुंबई, महाराष्ट्र, भारत, ४०००६२

**Telephone**: +91 7038164022

**Email:** publicationebook@gmail.com

**प्रथमावृत्ती: ७ ऑगस्ट २०१९**

**© 2019, सर्वाधिकार कवीकडे सुरक्षित आहेत.**

**मुखपृष्ठ:**

Sylvan Lobo

Parra, Bardez, Goa

M: +91 9823836903

Email: sylvanlobo@gmail.com

# eBook Terms & Conditions

## This eBook* may be

a. Distributed without modification or sale.

b. Copied for personal and educational use.

c. Printed for personal and educational use.

## This eBook* may NOT be

a. Sold individually or as part of package.

b. Modified in any way.

c. Reversed-engineered.

This eBook* and all its content including images are under Copyright © 2019 Hanumant H. Redkar - All rights reserved.

*eBook refers to this PDF and any of its content including pages and images in either electronic or printed form.

माझं हे पुस्तक
ह्या संसारातील
तमाम ‘ती’ यांना समर्पित करतो.

‘ती’ म्हणजे आई, ‘ती’ म्हणजे ताई,
‘ती’ म्हणजे माई, ‘ती’ म्हणजेच धरताई

- तुमचा आशीर्वाद सदाकाळ
  माझ्या पाठीशी असू द्या.

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

**आद्यमेकं परब्रह्म नित्यमुक्तमविक्रियम् ।**

**तस्य माया समावेशो जीवमव्याकृतात्मकम् ॥ दा.बो. ८. २ ॥**

अर्थात श्री समर्थ रामदास स्वामी म्हणतात –

**आदि येक परब्रह्म । नित्यमुक्त अक्रिय परम ।**

**तेथें अव्याकृत सूक्ष्म । जाली मूळमाया ॥दा.बो. ८. २. ३ ॥**

ती म्हणजे कोण तर ती या पदाने दर्शविली जाते ती जी ईश्वराची शक्ती आहे ती माया जसे –

**माया हे अनादि असे । शक्ती ईश्वराची ॥ दा.बो. ८. २. २९ ॥**

तर

**मूळमाया तोचि मूळपुरुष । तोचि सर्वांचा ईश ॥ दा.बो. ८. २.२३ ॥**

म्हणूनच 'ती'ला जाणून घेण्याचा प्रवास म्हणजे जीवनाला समजण्याचा अभ्यास. मायेची अनेक रूपे श्री समर्थ रामदास स्वामींनी वर्णिली आहेत जशी – कारणपरत्वे मूळमाया, महामाया, वैष्णवीमाया, गुणमाया, गुणक्षोभिणीमाया, अविद्यामाया आणि दृश्यमाया इत्यादी. आता ही मायेची विभिन्न रूपे कशी व्यक्त होतात तर 'ती'च्या द्वारे अर्थात जेव्हा माया विश्वरूपाने जडत्वात येते, म्हणजे इंद्रियगम्य अशा स्थूल दृश्य स्वरूपात येते तेव्हा अविद्यामाया वा दृश्यमाया होते (दा.बो.११.१.९) म्हणजे 'ती' म्हणून जन्म घेते जी या लौकिक जगात आई, मुलगी, बायको, सून, सासू इत्यादी नावांनी कारणपरत्वे ओळखली जाते.

म्हणून ‘ती’ अनादी आहे. अशा या सर्व चराचर सृष्टीची जन्म दात्री ही ‘ती’ आहे, मग ‘ती’ आई, मुलगी, बायको, इत्यादी कोणत्याही रूपात असो, तिच्या विषयी कृतज्ञता अभिव्यक्त करण्याच्या प्रयत्नातून कवी हनुबाब काव्य रसिकांसमोर ‘ती’चे निरूपण करीत आहेत. मुख पृष्ठापासूनच त्यांना ती ही सर्वांचे मूळ आहे हेच सांगायचे आहे, म्हणूनच प्रस्तावनेची सुरुवात ती म्हणजे मूळ माया हिच्या वंदनेने करावी वाटली. मराठी साहित्यात ‘ती’ ची पहिली ओळख वा आठवण होते बालकवींमुळे त्याच्या ‘ती फुलराणी’ने, किती सुंदर आहे ती पहा बालकवी म्हणतात –

**छानी माझी सोनुकली ती, कुणाकडे ग पाहत होती?**

**असं विचारून तो रविकर का गोजिरवाणा आवडला अमुच्या राणींना?**

लगेचच तिची ती भावविभोर मुद्रा टिपतात -

**लाजलाजली या वचनांनी, साधी भोळी ती फुलराणी !**

लोपामुद्रा साध्वीविषयी वर्णन करताना टेंबे स्वामी म्हणतात –

**त्वत्सम नान्या पतिव्रते । पतिदेवते तूं धन्या ॥**
**कदापि न स्वतंत्रता । पतिसेवननिरता ।**
**छायेपरी पतिदेवता । पतिव्रता ती पतिचित्ता ॥**
**जेवी भुंजीता पति । पतिपूर्वीं स्नान करी ती ।**
**उठे आधीं निजे उपरांती । न बसे ती पतिपुढें ॥**
**जी न जाय घराबाहेर । करीपत्युच्छिष्टाहार ।**

**पतिवचनीं जी सादर । निरंतर अनुकुल ॥**
**जी आनंदे दैवलाभें । वस्त्रभूषणीं न क्षोभे ।**
**धर्म सोडिना देहलोभें । ती शोभे निजधर्मे ॥**
**[सप्तशती गुरूचरित्र ३. २ - ६]**

अशी ही 'ती' संस्कृत मध्ये षाड्गुण्यवती म्हणून वर्णिली आहे –

**कार्येषु मन्त्री करणेषु दासी भोज्येषु माता शयनेषु रम्भा ।**
**धर्मानुकूला क्षमया धरित्री भार्या च षाड्गुण्यवतीह दुर्लभा ॥**

'ती' षाड्गुण्यवती होते कारण मूळमायेत पंचभूते आणि सत्त्व, रज व तम हे तीन गुण सूक्ष्मरूपाने असतात. हे तीन गुण मूळमायेतून प्रकट झाले की तीच माया गुणक्षोभिणी माया किंवा गुणमाया या होते. ही गुण माया कवी हनुबाब मांडताना तीची रूपे अत्यंत साध्या आणि ओघवत्या भाषेत मांडली आहेत, पहा जसे –

**ती असते आई, तिच्यात असते ताई**
**माया करणारी माई, शिक्षण देणारी बाई**
**ती असते मुलगी, तीच असते पुतणी**
**तिच्यातच आहे भाची, तीच आहे आपली आजी**

अशी सर्व मायेची रूपे येथेच स्पष्ट करून मग पुढे वेगवेगळ्या 'ती'ची ओळख करून देतात जसे पहा-ती येणार या कवितेत कवी तिचं प्रेम आभाळासारखं आहे असं म्हणतो येथे आभाळासारखं म्हणजे अखंड, अमर्यादित, अंनत ही जी विशेषणे आहेत त्या बरोबर कवीला सांगायचं

आहे आभाळाला जसं आपल्या कवेत घेता येत नाही पण म्हणून ते नाही असं ही नाही, तसं तिचं प्रेम आहे पण म्हणून ते व्यक्त आहे असं नाही पण नाही असं ही नाही. म्हणून ते आभाळासारखं आहे. तर एका ठिकाणी कवी म्हणतो –

**मी एकदा असाच बसलो होतो निवांत**
**रात्री-अपरात्री एका स्टेशनच्या आवारात**
**अचानक ती समोर आली**
**नि माझ्याशी बोलायला लागली**

आणि जे काही घडलं ते सर्व अत्यंत निर्मळपणे व्यक्त करतो आणि तो भावुकपणा

**काहीही असू द्या, मला ते आवडलं**
**तिचं येणं, माझ्याशी बोलणं, बरं वाटलं**

यातून स्पष्ट होतो, “ती, ती धरताई, ती फक्त आईच अस ते” या तीन कविता ‘ती’चे वैश्विक रूपाचे वर्णन करतात आणि त्यानंतर ती येणार, असं वाटतं राहतं म्हणून मनाशी ठरवलं की एकदाचं तिला भेटावं, असं विचार कवी करतो तोच अशीच मला ती भेटली आणि तिची ती भेट झाली आणि तो तिच्यात गुंतला पण दैव योग पहा कवी म्हणतो –

**शब्द ते माझे राहिले अधुरे**

**नाही पोहोचले नाही वाचले**

**कशी समजणार माझी भावना**

**सांग मला हे माझ्या कृष्णा?**

**नाही समजू शकत तुझी माया**

**ती का समजत नाही या बद्दल म्हणतो**

**जशी राधा तुझी असूनही तुझी नाही झाली**

**तशीच का रे माझी ती माझी नाही राहिली?**

**काय आहे हे कोडं सांग सख्या हे कृष्णा**

**कुठे मी नि कुठे ती, सांग मला माझ्या कृष्णा?**

अशी ही अगम्य ती असून ही कवी अखेरीस जरी प्रत्येक वेळी हे दाखवून पण तो तिला दिसला नाही तरीही तू अशीच हसत रहा असं म्हणतं शुभेच्छा देतो की –

**तू अशीच हसत रहा, मोकळेपणाने जगत रहा**

**मन पिसाऱ्यांना फुलवत रहा, आनंदाने तू जीवन खुलवत रहा**

**जीवन गीत गातच जा, स्वतःची स्वप्नं साकारत जा**

**आयुष्याची गाडी चालवत जा, जीवन आनंदमय बनवत जा**

थोडक्यात,

**जिनें नव मास वाहिलें पोटीं ॥ तीस म्हणें परम करटी ॥**

असं म्हणून अवहेलना करू नका कारण –

**तिच्या पासून सगळं सुरु होतंय**

**तिच्या पर्यंत येऊन सगळं संपतंय**

**तीच आपली सुरुवात**

**तीच आपली शेवट**

म्हणून जसे ज्ञानेश्वर माऊली म्हणतात तसे –

**जी तूंचि तूं सर्वां यया । मा कोणा बोधु कोणा माया । ज्ञाने. १३. ६ ।।**

मग ती जरी माया असो तरी आम्हांस

**किंबहुना माया असोस । ज्ञान जी तुझेनि डोळस ।ज्ञाने. १३. १० ।।**

ज्ञान रूपी डोळे लाभो नि डोळसपणे योग्य मान सन्मान ती'स मिळो, हीच गुरु चरणी प्रार्थना !!

- **श्री. नीलेश जोशी**

**मुंबई**

# ‘ती’च्या विषयी चार शब्द

**ती असते आई**

**तिच्यात असते ताई**

**माया करणारी माई**

**शिक्षण देणारी बाई**

...

‘ती’ हा विषय पाहिलं तर गंभीर आणि नाजूक आहे. बराच काळ मी ‘ती’ या व्यक्तिरेखेला जाणण्याचा, ओळखण्याचा, समजण्याचा प्रयत्न करत आहे. जस जसा मी या विषयाच्या जास्त खोलात जात गेलो, तस तशी ‘ती’ मला नव नवीन स्वरूपात भेटत गेली. ‘ती’ची रूपं अनेक आहेत, ‘ती’ असते एक चिमुकली आणि तिचे ते बालमन, ‘ती’ असते लहान मुलगी आणि तिचे ते लहानपण, ‘ती’ असते युवती आणि तिचे ते यौवन, ‘ती’ असते बाई आणि तिचे ते बाईपण, ‘ती’ असते आई आणि तिचे ते आईमन, ‘ती’ असते आजी आणि तिचे ते आजीपण, ‘ती’ असते देवी आणि तिची ती दैवी माया; तसेच ‘ती’ची बरीच इतर पात्रे आपल्या अवती भवती आढळतात आणि आपल्यात मिसळतात.

'ती'ला समजणं थोडं कठीणच होतं, तरीही 'ती'ला मी माझ्या दृष्टीने जसं समजू शकलो, तसं मी या पुस्तकात अभिव्यक्त करण्याचा प्रयत्न केला आहे.

'ती' या विषयावर लिहिण्यासाठी मला स्फूर्ती मिळाली ती म्हणजे मला भेटलेल्या आणि न भेटलेल्या त्या सर्व 'ती'पात्रांपासून. मला अशी बरीच 'ती'पात्रे माझ्या दैनंदिन जीवनात भेटत आली आहेत, तर थोडी 'ती'पात्रे मला माझ्या मित्रमंडळींच्या अनुभवाने भेटलेली आहेत.

एक 'ती' मला आगगाडीत भेटली, एक 'ती' मला दुकानात भेटली, एक 'ती' मला सायकल चालवताना भेटली, एक 'ती' मला माझ्या प्रांगणात भेटली, एक 'ती' मला मित्राच्या प्रेमात भेटली, एक 'ती' मला माझ्या मित्राच्या डोळ्यात दिसली, एक 'ती' मला माझ्या आठवणीत भेटली, एक 'ती' माझ्या कल्पनेत जन्मली, एक 'ती' मला स्वप्नात दिसली, एक 'ती' मला धरती मातेत भेटली, एक 'ती' मला राधा-कृष्णकथेत उमजली, एक 'ती' मला 'ती'च्याच विवंचनेत भेटली, नकळत एक 'ती' मला माझ्याच डोळ्यात भेटली, आणि एक 'ती' मला प्रत्येक त्या स्त्रीत भेटली, एक 'ती' मला माझ्या आईत भेटली, आणि 'ती'च एक मला आनंदात हसताना भेटली. अशा अनेक 'ती'ना मी

सामोरे गेलो, त्यांना समजण्याचा प्रयत्न केला, त्यांच्या भावना जाणून घेतल्या आणि या पुस्तकात माझ्या साध्या सरळ शब्दात मांडल्या.

माझं हे 'ती'वर आधारित पुस्तक लिहिण्यासाठी प्रेरणा ठरलेल्या तमाम 'ती' यांचा मी आभारी आहे; कारण 'ती' ही बहुपात्री व्यक्तिरेखा जर अस्तित्वात नसती, तर हे पुस्तक कधीच घडलं नसतं. मला 'ती' समजण्यासाठी सगळ्यात जास्त मदत केलेल्या माझी मैत्रीण नाज़ हिचा मी मनापासून आभारी आहे. तसेच माझ्या आयुष्यात प्रत्यक्षरूपी व अप्रत्यक्षरूपी आलेल्या तमाम 'ती' यांचापण मी आभारी आहे. श्री. नीलेश जोशी यांनी या पुस्तकाला एक सुंदर प्रस्तावना लिहून या पुस्तकातील 'ती'ची शान वाढवली आहे, त्यांचा मी ऋणी आहे. या पुस्तकाला मूळ'ती' अन्वर्थक असे सुंदर मुखपृष्ठ दिल्याबद्दल सिल्वन लोबो याचा मी खूप आभारी आहे. माझं हे पुस्तक 'eBook Publication India Pvt. Ltd.' या प्रकाशन संस्थेने प्रकाशित करून आणलं म्हणून मी त्यांचा पण आभारी आहे.

आणि शेवटी माझं सगळ्यात मोठं 'ती' वरचं शिक्षण केंद्र असलेल्या माझ्या आईचा मी विशेष आभारी आहे.

आशा करतो की हे माझं पुस्तक, माझ्या कविमनातली 'ती' तुम्हाला जरूर आवडेल आणि सदा काळ लक्षात ठेवा –

**मित्रहो, भावांनो, द्या तिला मान**

**करू नका तिचा कधीच अवमान**

**असावा तिचा आम्हास अभिमान**

**कारण तीच आहे आपला सम्मान**

'ती'साठी माझं हे म्हणणं आहे –

**अगं ए 'ती', तुला म्हणतो मी**

**तू अशीच हसत रहा, मोकळेपणाने जगत रहा**

**जीवन गीत गातच जा, स्वतःची स्वप्नं साकारत जा**

**आयुष्याची गाडी चालवत जा, जीवन आनंदमय बनवत जा**

**|| तू अशीच हसत रहा ||**

**हनुबाब**

गोवा

९०४९०८३०२५

# ती

ती असते आई
तिच्यात असते ताई
माया करणारी माई
शिक्षण देणारी बाई

ती असते मुलगी
तीच असते पुतणी
तिच्यातच आहे भाची
तीच आहे आपली आजी

ती आहे बहीण
तीच असे मैत्रीण
तिच्यात असे सजणी
तीच बनते जीवन संगिनी

हीच ती महिला, तीच ही महिला

म्हणूनच म्हणतो - द्या तिला मान
करू नका तिचा कधीच अवमान
असावा तिचा आम्हास अभिमान
कारण तीच आहे आपला सम्मान

# ती धरताई

ती धरती, ती माझी आई
ती माता, म्हणा तिला धरताई
ती पृथ्वी, तीच आपली सृष्टी
ती देवी, तीच जीवन दृष्टी

ती आहे म्हणून आपण आहोत
तीच आपल्याला अन्न  देते
तीच हवा पाणी आणि छत्र देते
सगळं काही तीच आणि तीच देते

तिच्या पासून सगळं सुरु होतंय
तिच्या पर्यंत येऊन सगळं संपतंय
तीच आपली सुरुवात
तीच आपली शेवट

ती आपल्याला घडवणारी
ती आपल्याला बहरवणारी
ती आपल्याला तारणारी
आणि तीच आपल्याला संपवणारी

अशी आहे आपली ही माई, आपली धरताई
नका संपवू तिला, नका करू नासाडी, नका त्राही
ती संपली तर आपण संपणार, आपण मरणार
ती असली तर आपण असणार, आपण जगणार

तिला जगवा, तिला सांभाळा,
तिला बनवा, तिला घडावा
कारण तीच आहे आपली आई
तीच आहे आपली माई, आपली धरताई
तीच आहे आपली धरताई

# ती फक्त आईच असते

आई कशी असते
आई अतिशय प्रेमळ असते
मुलांवर सगळा प्रेम नौछावर करणारी
ती फक्त आईच असते

इतरांपेक्षा आपला बाळ तिला प्रिय असतो
कसा का असेना तो तिला आपला असतो
जरी कितीही वाईट असला
तरीही आईसाठी तो आपला बाळ असतो

मुलांच्या कितीतरी चुका ती माफ करते
रागावते, रुसते, पण मनातनं कधीच नसतं ते
मुलांच्या प्रत्येक बऱ्या-वाईट क्षणात ती आधार देते
ती आईच असते, जी सतत सावरते नि पाठींबा देते

दिवस-रात्र तिला फक्त मुलांचीच चिंता
उठता-बसता खाता-पिता मुलांचीच कथा
थोडा पण त्रास झाला मुलांना
पोहोचतात तिला खूपच वेदना

अशी श्रेष्ठ आहे आई आपली
ती माता तीच आहे माऊली
मुलांच्या या जीवन यात्रेतली
आहे ती अखंड अनंत सावली

# ती येणार

ती येणार
मला भेटणार
हळूच मनातली
प्रेमभावना जागवणार

ती असेल
कुठेतरी असेल
वेळ आल्यावर
मला ती दिसेल

ती शोधेल
मला ती शोधेल
मनातली तार जुळल्यावर
मला ती भेटेल

ती दिसणार
हळूच ती दिसणार
आभाळासारखं प्रेम
व्यक्त ती करणार

ती मिळणार
मला ती मिळणार
माझ्या या प्रेममनात
येऊन ती मिसळणार

## एकदाचं तिला भेटावं

ती येते
मला बघते
गालात हसते
खूप बरं वाटते

तिच्या मनात काय असते
मला सहजा नाही समजते
पण जेव्हा जेव्हा ती मला बघते
मनातील स्पंदनं हळू हळू जागवते

तिचा तो साधा चेहरा
करतो मला हो बावरा
बनतो मी असा बेचारा
बघून तो तिचा मस्त तोरा

मनात येतं एक दिवस जावं
तिला जाऊन एकदाचं भेटावं
तिच्या मनात काय बरं असावं
भेटून तिला निवांत विचारावं

# अशीच मला ती सहज भेटली

आज मला एक मुलगी भेटली
थोडी वेगळी थोडी आगळी
अशीच मला ती सहज भेटली
आगगाडीच्या प्रवासात मला ती भेटली

रुबाबात तिच्या होती शान
दिसत होती फारच छान
हरवले होते मी पंचप्राण
गात होतो मी मनातील गान

बसली होती ती माझ्या शेजारी
त्याच क्षणी मी झालो आजारी
होती खरीच ती एक बेचारी
माझ्या मनात हळूच बसणारी

बराच काळ गेला निसटून
प्रयत्न नव्हता केला स्वतःहून
तिनेच सुरु केले बोलायला मधून
बोलत होती ती अधून-मधून

मला वाटलं तिचं झालं लग्न
म्हणून होतो मी पुस्तकात मग्न
पण नव्हते तिच्या गळ्यात लग्न
म्हणूनच झालो मी तिच्यात मग्न

पुस्तकात ती माझ्या रमली
वाचकमित्रांची ती जोडी जमली
तिला वाटलं पुस्तक वाचतच जावं
म्हणूनच तिने ते मागितलं असावं

शेवटी तिचे ते स्टेशन आले
जाण्यासाठी तिने पाऊल उचलले
जाता-जाता तिने उद्गार ते काढले
'बाय हॅप्पी जर्नी' अगदी प्रेमाने म्हटले

अशी होती ही भेट सुरेख
माझी आणि तिची मैत्री नेक

## तिची ती भेट

तिची ती भेट
झाली अशी थेट
मनाला केलं मेल्ट
वाटलं मला किती ग्रेट

सकाळी ती अशीच आली
मला येऊन नुकतीच भेटली
सायकल माझी तिने घेतली
माझी सायकल मलाच मुकली

सायकल होती माझी महान
दिसत होती ती तिच्यावर छान
विसरुन गेलो मी माझेच भान
गाऊ लागलो मी मनातील गान

क्षण होते ते सगळेच अप्रतीम
तिच्या सहवासाने झाले रंगीन
तिचा तो साधा-सुरेख चेहरा
माझं मन वेधू लागला हो खरा

क्षणभर वाटलं असावा तिचा साथ असाच
बाबांकडे तिच्या मागावा तिचा हात हमखास
पण का म्हणून येतात असे विचार उगाच?
मनाशी तिच्या बोलून पाहू का मी एकदाच?

## तिचं येणं, माझ्याशी बोलणं

मी एकदा असाच बसलो होतो निवांत
रात्री-अपरात्री एका स्टेशनच्या आवारात
अचानक ती समोर आली
नि माझ्याशी बोलायला लागली

मी तिला बघतच राहिलो
ती मात्र बोलतच राहिली
मला काहीच नाही ऐकू आलं
मन माझं तिला बघण्यातच रमलं

थोड्या वेळाने मी आलो भानावर
संपलं होतं तिचं बोलणं तोवर
ती काय बोलली, नाही मला समजलं
पण जे काय ती बोलली, मला ते गवसलं

काहीही असू द्या, मला ते आवडलं
तिचं येणं, माझ्याशी बोलणं, बरं वाटलं
इतक्यात मी आलो भानावर, तेव्हा समजलं
ती आली, माझ्याशी बोलली, हे स्वप्नात दिसलं

## ती असल्याचा आभास

आठ दिवस झाले आज
आठवणीचे दिवस सात
प्रत्येक दिवसाचा सुवास
ती असल्याचा आभास

आज तिची आठवण आली
मनातील स्पंदनं जागी झाली
चेहऱ्यात तिच्या मन गुंतू लागलं
रुबाबात तिच्या भान हरपू लागलं

मनात तिच्या मला डोकवायचय
मनातील भाव मला जाणवायचेत
मनात बसलीस तिला कळवायचय
मनातील भाव मला पोहोचवायचेत

तिच्याशी मैत्री करावीशी वाटते
तिला जाणून घ्यावेसे वाटते
मला तिने जाणावेसे वाटते
मगच पुढे जावेसे वाटते
मगच पुढे जावेसे वाटते...

# ती तशी तिकडे

ती तशी तिकडे
मी असा इकडे
दोघे होतो एकीकडे
बघत होतो एकामेकांकडे

कधी ती बघायची
कधी मी बघायचो
कधी नजरा चुकायच्या
तर कधी त्या भिडायच्या

तिने मला बघितले
नि मी तिला पाहिले
डोळे एकमेकांना भिडले
दोघे एकमेकांत घुळले

तिला मी पसंद पडलो
मला ती पसंद पडली
अशी आम्हा दोघांची जोडी
एकमेकांच्या मनात रुजली

# अबोल ती ऐकली

एकदा मला अशीच एक मुलगी भेटली
थोडी निवांत, थोडी शांत, अबोल ती ऐकली
होत्या तिला अनेक अपेक्षा, अनेक आकांक्षा
मिळायचा तिला बराच मान, बरीच प्रशंसा

मनात असेल ते बोलून ती दाखवायची
मनातील काहीच ती नाही दडवायची
आपला माणूस समजून अधिक सांगायची
म्हणून बहुदा ती प्रत्येक वेळी फसायची

खुश राहायची ती दरएक क्षणात
हसत असायची ती प्रत्येक गोष्टीत
नसायची तिला कसलीच भीती, कसलीच चिंता
म्हणूनच जणू परके घेत असे तिचा फायदा

पण माणूस असल्याने तिला असायच्या अनेक वेदना
नाही मिळायच्या तिला सगळ्यांकडूनच सांत्वना
त्यामुळे एकटी बसून ती रडायची मुकाट्याने
आणि वाट बघायची ती कुणाचीतरी आत्मीयतेने

कुणी आला, आपलंस म्हटलं, बरं वाटायचं
सगळ्या वेदना, सगळं दुःख, दूर जायचं
पण असला माणूस कुठे म्हणून शोधायचा
तिच्या मनातला 'तो' कधी म्हणून सापडायचा?

# तो तिच्यातच गुंतला

ती असते त्याच्या मनात
ती असते त्याच्या स्वप्नात
तीच असते त्याच्या ध्यानात
आणि तीच असते त्याच्या प्रेमात

तिला तो कधीच विसरला नाही
तिने त्याला कधीच विचारलं नाही
दोघे एकमेकांना नुसतं पसंद करायचे
तिच्याकडून त्याला हे कधीच न कळायचे

तिला त्याच्यातला भाव कधीच नाही समजला
कारण त्याच्यापेक्षा तिला पगार मोठा वाटला
तरीही तो तिच्यावर अगदी मनातून प्रेम करत राहिला
प्रत्येक वेळी हे दाखवून पण तिला तो नाही दिसला

त्याला माहीत होतं की नाही ती त्याची होऊ शकत
तिचा तो पगार, तिचे ते शिक्षण, यांच्यात बराच होता फरक
प्रयत्न करूनही तो तिच्या ऐपतीपर्यंत नाही पोहोचू शकला
तरीही तिचं प्रेम जिंकेल या अपेक्षेत जगतच राहिला

शेवटी ती गेली त्याला सोडून
त्याच्या प्रेम-अपेक्षा सगळ्या तोडून
ती जाऊन तिच्या आयुष्यात गुंतली
आणि हा मात्र अजून पण तिच्यातच गुंतला

# कुठे मी नि कुठे ती

मोठे मोठे शब्द हे तुझे
नाही समजत मला हे असे
नाही समजू शकत तुझी माया
कुठे राधा नि कुठे कृष्ण?

शब्द ते माझे राहिले अधुरे
नाही पोहोचले नाही वाचले
कशी समजणार माझी भावना
सांग मला हे माझ्या कृष्णा?

बघतो तिला मी आज पण
नाही तिला माझी आठवण
असतो मात्र मी तिच्यात गुंतत
का रे कृष्णा तिला हे नाही समजत?

दिसते मला ती अशी हळूच
समोर असूनही शकत नाही बोलूच
वाट बघतोय आज पण तिचीच
का रे राधाला लागलं राहावं उगीच?

जशी राधा तुझी असूनही तुझी नाही झाली
तशीच का रे माझी ती माझी नाही राहिली?
काय आहे हे कोडं सांग सख्या हे कृष्णा
कुठे मी नि कुठे ती, सांग मला माझ्या कृष्णा?

# आपल्यातल्याच 'ती'ची विवंचना

मूल जन्माला येण्याआधीच करी पुत्रासाठी कामना
पुत्र जन्माला आला की करी जगभरात घोषणा
चुकून जरी पुत्री जन्मली तर करी देवाशी आलोचना
अशी आहे आजच्या आपल्यातल्याच 'ती'ची विवंचना

जेव्हा ती लहान होती प्रेम माया भरपूर मिळती
जशी जशी ती मोठी होती जबाबदारीचे धडे शिकती
जेव्हा ती समंजस बनती घराभाहेर जाण्यास आपत्ती असती
अशी आपल्यातलीच 'ती' जग अनुभवायला मुकती

माहेरी ती धुणी-भांडी, जेवण, सारवण, सगळंच शिकती
सासरी हे सगळं करती नि नवा संसार पण सांभाळती
हे सगळं ती एकटीने करती पण तिला कोण विचारती
अशी हि आजची 'ती' आपुलकीला बरीच तरसती

जरी ती एक दिसती, रूपं तिची अनेक असती
मुलगी, बाई, आई, आजी यांचा अभिनय ती करती
प्रत्येक भूमिका वेळोनवेळी अचूक ती निभावती
अशी ही आपलीच 'ती' आपल्यांच्याच प्रशंसेला मुकती

## तू अशीच हसत रहा

तू अशीच हसत रहा
मोकळेपणाने जगत रहा
मन पिसाऱ्यांना फुलवत रहा
आनंदाने तू जीवन खुलवत रहा

क्षणात क्षण मिसळत जा
प्रत्येक क्षणात तू जगत जा
जीवनाचा आस्वाद घेतच जा
मन मोकळं तू करतच जा

सुखी जीवन जगत रहा
दुःखी आयुष्य दुरावत रहा
चांगल्या गोष्टी घडवत रहा
वाईट अनुभव उधळवत रहा

जीवन गीत गातच जा
स्वतःची स्वप्नं साकारत जा
आयुष्याची गाडी चालवत जा
जीवन आनंदमय बनवत जा




एक ‘ती’ मला आगगाडीत भेटली, एक ‘ती’ मला दुकानात भेटली, एक ‘ती’ मला सायकल चालवताना भेटली, एक ‘ती’ मला माझ्या प्रांगणात भेटली, एक ‘ती’ मला मित्राच्या प्रेमात भेटली, एक ‘ती’ मला माझ्या मित्राच्या डोळ्यात दिसली, एक ‘ती’ मला माझ्या आठवणीत भेटली, एक ‘ती’ माझ्या कल्पनेत जन्मली, एक ‘ती’ मला स्वप्नात दिसली, एक ‘ती’ मला धरती मातेत भेटली, एक ‘ती’ मला राधा-कृष्णकथेत उमजली, एक ‘ती’ मला ‘ती’च्याच विवंचनेत भेटली, नकळत एक ‘ती’ मला माझ्याच डोळ्यात भेटली, आणि एक ‘ती’ मला प्रत्येक त्या स्त्रीत भेटली, एक ‘ती’ मला माझ्या आईत भेटली, आणि ‘ती’च एक मला आनंदात हसताना भेटली. अशा अनेक ‘ती’ना मी सामोरे गेलो, त्यांना समजण्याचा प्रयत्न केला, त्यांच्या भावना जाणून घेतल्या आणि या पुस्तकात माझ्या साध्या सरळ शब्दात मांडल्या.

\- हनुबाब



eBook Publication Pvt. Ltd.®